**पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी प्रभादेवी, मुंबई व रविंद्र नाटय मंदिर आवारामधील नुतनीकरणाच्या कामामध्ये अत्याधुनिक सिनेमा प्रोजेक्टर, गुड्स लिफ्ट तद्अनुषंगिक बाबींकरीताच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र.पुलदे -२०२५/प्र.क्र.३३ (E-९८८४६१)/सां.का.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १३ मार्च, २०२५

वाचा :- १. कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई विद्युत विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, वरळी, मुंबई यांचे पत्र क्र.काअ/ममुंविवि/२८६७/सन २०२४, दि.२६.११.२०२४.
२. संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांचे पत्र क्र. पुलदे/आस्था/२०२५/११७, दि. ३१.०१.२०२५.

**प्रस्तावना :**

"स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव" या एकछत्री योजनेतंर्गत मंजूर निधीतून **पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी प्रभादेवी, मुंबई व रविंद्र नाटय मंदिर आवारामधील** नुतनीकरणाचे काम सार्वजनिक बांधकाम विभागाकडून पूर्ण करण्यात आले असून, नूतनीकृत इमारतीचा उद्घाटन सोहळा सद्य:स्थितीत पार पडला आहे. सदर नूतनीकृत कामाच्या अनुषंगाने अत्याधुनिक सिनेमा प्रोजेक्टर, गुडस लिफ्ट तद्अनुषंगिक बाबींकरीता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून रुपये ४,४२,६३,९१०/ इतक्या रकमेचे ढोबळ अंदाजपत्रक अकादमीस सादर केले आहे. तसेच,सदर अंदाजपत्रकास अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचेकडून उपरोक्त संदर्भ क्र. १ च्या पत्रान्वये सहमती प्रदान करण्यात आली आहे.

त्यानुसार पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी व रविंद्र नाटय मंदिर **आवारामधील** नुतनीकरणाच्या कामामध्ये अत्याधुनिक सिनेमा प्रोजेक्टर, गुडस लिफ्ट तद्अनुषंगिक बाबींकरीताच्या रुपये ४,४२,६३,९१०/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची विनंती संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये केली आहे. त्यानुसार सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

**पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई व रविंद्र नाटय मंदिर आवारामधील** नुतनीकरणाच्या कामाच्या अनुषंगाने अत्याधुनिक सिनेमा प्रोजेक्टर, गुड्स लिफ्ट तद्अनुषंगिक बाबींकरीताच्या **खालील तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या ढोबळ अंदाजपत्रकास** खालील अटींच्या अधीन राहून शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | रक्कम |
|---|---|---|
| १ | Estimate D२१२४६/२०२४-२०२५ Providing Advance Movie Projector with inbuilt server, Goods Lift, Protection Guard for LED with UPS supply & repairs to existing firefighting system & accessories at P L Deshpande Kala Akadami at Prabhadevi, Dadar. | रु.४,४२,६३,९१०/- |

**अटी-**

- सदरच्या अंदाजपत्रकास तांत्रिक सहमती प्रदान केल्यानंतरच प्रत्यक्ष कामास सुरूवात करावी. तसेच, तांत्रिक मंजूरी आदेशाची प्रत शासनास उपलब्ध करून देण्यात यावी.
- प्रत्यक्ष काम सुरु करण्यापुर्वी सर्व संबंधित प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.
- प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
- सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र. बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२ दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
- सदर कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता भासणार नाही दृष्टीने विशेष दक्षता घेण्यात यावी.
- अंदाजपत्रकीय कामात बदल करु नये.
- सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंता यांनी तोंडी दिलेल्या सूचनांच्या आधारावर कामाच्या व्याप्तीत बदल किंवा नवीन कामे समाविष्ट करु नयेत.
- नवीन कामांचा समावेश करावयाचा झाल्यास किंवा व्याप्तीत बदल करावयाचा झाल्यास याबाबत लेखी आदेश प्राप्त करुन विहित मुदतीत व विहीत पध्दतीने सदर कामांना मंजूरी घेण्याची कार्यवाही करावी.
- स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करण्यात यावी.

- प्रस्तावातील खरेदीसंबंधित बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग,ऊर्जा,कामगार विभागाच्या दि. १.१२.२०१६ च्या शासननिर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घेण्यात याव्यात.

०२. यासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक "झेडडी-२, प्रधान लेखाशिर्ष २२०५ कला व संस्कृती (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ ३७३३), ५०-इतर खर्च" या लेखाशीर्षाखालील सन २०२४-२५ या वित्तीय वर्षातील उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा. तसेच सदरचा निधी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे "ठेव अंशदान निधी" म्हणून वर्ग करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३ /प्र.क्र.३०/२०१३ / विनियम, भाग-दोन, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उप विभाग-पाच मधील अ.क्र. १ मधील नियम क्र. १३४ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०३१३१३२८१६२४२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a18662 0ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C53268 4054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2025.03.13 13:29:04 +05'30'

**(नंदा राऊत)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

७. महालेखापाल (लेखा परीक्षा) -१ महाराष्ट्र, मुंबई.

८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर.

९. अवर सचिव/कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई.

१०.निवडनस्ती, सां.का.२